सन २०२३-२४ करीता राज्य योजनेंतर्गत वनकर्मचा-यांना प्रशिक्षण (४४१५ ०१५४) या योजनेचा चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०२३/प्र.क्र.५६ /फ-२**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २२ मार्च, २०२४.

**वाचा** :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, ०५/०२/२०२४ व ०४/०३/२०२४.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३३/१००७/२०२३-२४, दि.१०.०२.२०२४, दि.१४.०२.२०२४.

**प्रस्तावना :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्र.२ येथील प्रस्तावान्वये "वन कर्मचा-यांना प्रशिक्षण" (४४१५ ०१५४) या योजनेंतर्गत चालू बाब प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. सन २०२३-२४ करीता "वन कर्मचा-यांना प्रशिक्षण" (४४१५ ०१५४) या योजनेसाठी ५०- इतर खर्च रु.७७०.८८ लक्ष अनुदान अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध आहे. तथापि, वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्सवर) "वन कर्मचा-यांना प्रशिक्षण" (४४१५ ०१५४) या योजनेसाठी ५०- इतर खर्च रु.२३१.२६ लक्ष अनुदान उपलब्ध करुन दिले आहेत.

३. त्या अनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी "वन कर्मचा-यांना प्रशिक्षण" (४४१५ ०१५४)" या लेखाशीर्षाअंतर्गत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

४. प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य,नागपुर यांनी प्रस्तावित केल्यानुसार आणि वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्सवर) निधी उपलब्ध करुन दिल्यानुसार "वन कर्मचा-यांना प्रशिक्षण" (४४१५ ०१५४) या योजनेसाठी ५०- इतर खर्च रु.२३१.२६ लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला असून रु.१९७.०२ लक्ष इतका खर्च करण्यात आला आहे. यास्तव लेखाशिर्ष (४४१५ ०१५४) या योजनेसाठी ५०- इतर खर्च या उद्दिष्टाखाली सुधारित अंदाजाच्या ७० % मर्यादेत म्हणजे अतिरिक्त रु.१४६.७४ लक्ष इतका निधी खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**५. सदरहू शासननिर्णयास मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे:-**

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

४. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

५. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

६. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.

७. सदर आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

८. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

९. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य,नागपुर यांनी संस्थेला मागील वर्षाकरिता उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

१०. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

११. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ रोजीचे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१२. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतूदी तसेच प्रचलित कायदे व नियम मधील तरतूदींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

**६.** सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी.१०, प्रधान शिर्ष - ४४१५ कृषीविषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनाअंतर्गत योजना, २७७ शिक्षण, (००) (०३) वन कर्मचा-यांना प्रशिक्षण (राज्य) (४४१५ ०१५४) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**७.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये संबंधित प्रशासकीय विभागास निधी वितरीत करण्यास दिलेल्या अधिकारास अनुसरुन तसेच वित्त विभागाचा शासन

निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१११/व्यय १०, दिनांक १५/०३/२०२४ अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२२१६३६४०८२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

PRADNYA PRAMOD MULE

Digitally signed by PRADNYA PRAMOD MULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=2a213e61027be02368b2655e124509e72fb3a334568af81399 2b1c4e97e13f87, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CF29F03589BBC02EDE91053BB5AEF9A7F21612D23D0 578DB9118FC7E32141805, cn=PRADNYA PRAMOD MULE
Date: 2024.03.22 16:46:42 +05'30'

**( प्रज्ञा मुळे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.

४) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.

५) मुख्य वनसंरक्षक (संशोधन), महाराष्ट्र राज्य, पुणे.

६) संचालक, वनप्रशिक्षण संस्था, शहापूर/पाल/जालना.

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

८) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

९) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

१०) जिल्हा कोषागार अधिकारी नागपूर / पुणे

११) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

१२) निवडनस्ती , फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.